PL. Now Upload

ब-१, ब-२ इत्यादी प्रपत्रावर बोलावण्यात आलेल्या निविदेत परिशिष्ट अ मध्ये खात्यामार्फत कंत्राटदारास पुरवठा करावयाच्या भांडार साहित्याची असलेली तरतूद निरंक करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२००८/प्र.क्र.१५२/यंत्रकक्ष-बां.सा.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - १८ नोव्हेंबर, २००९.

संदर्भ- १) शासन परिपत्रक क्र. एसटीआर-१०९५/५७९१२/प्र.क्र. ७८/बां.सा., दि. १६.५.१९९६.
२) शासन परिपत्रक क्र. सिमेंट-१०९६/सीआर-१३२/बां.सा., दि. १७.३.१९९७.

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये, कामाच्या निविदा ब-१, ब-२ इत्यादी प्रपत्रावर निविदा बोलाविण्यात आल्या असता निविदेमधील परिशिष्ट-'अ' मध्ये खात्यामार्फत कामासाठी पुरवठा करावयाच्या भांडार साहित्याची तरतूद काढून खात्यामार्फत कंत्राटदारास परिशिष्ट -'अ' प्रमाणे भांडार साहित्याचा पुरवठा न करता त्याऐवजी बांधकामासाठी लागणारे असे साहित्य ( उदा. सिमेंट, लोखंड व डांबर इत्यादी ) हे कंत्राटदारांनी स्वतः आणावे ही तरतूद सर्वसाधारणतः ज्या कामांची किंमत १०० लक्ष रुपयांपेक्षा जास्त असेल त्यास लागू राहील अशा सूचना देण्यात आल्या होत्या. कालांतराने ह्यात तत्कालीन परिस्थितीनुसार अंशतः बदल करून निविदेमधील परिशिष्ट -'अ' प्रमाणे भांडार साहित्याचा पुरवठा न करता ज्या कामांची किंमत रूपये५० लक्ष पेक्षा जास्त असेल अशा बांधकामांसाठी लागणारे साहित्य ( उदा. सिमेंट, लोखंड व डांबर इत्यादी) हे कंत्राटदारांनी स्वतः आणावे अशा सूचना, संदर्भ क्र. २ येथील शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. सद्यःस्थितीत निधी अभावी शासकिय कामे हाती घेण्यात ब-याच अडचणी येत आहेत. ह्याचा परिणाम म्हणून काही कामे अपूर्णावस्थेत राहतात तर काही मोठी कामे हाती घेता येणे शक्य होत नाही. त्यामुळे राज्याचा आर्थिक विकास होण्यास बाधा निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. ह्या सर्व अडचणींवर मात करण्यासाठी जास्तीत जास्त कामे तसेच मोठे प्रकल्प खाजगीकरणाच्या माध्यमातून हाती घेऊन पूर्ण करण्याच्या धोरणाचा शासनाने अवलंब केला आहे. त्यामुळे खात्यामार्फत अत्यल्प प्रमाणांत कामे हाती घेण्यात येतात. परिणामतः भांडारसाठ्यातील बांधकाम साहित्य मोठ्या प्रमाणावर वापराविना पडून राहण्याची शक्यता असते. असे साहित्य कालांतराने वापरास निरुपयोगी होते. त्यामुळे ते निर्लेखित करणे भाग पडते. यामुळे शासनास मोठ्या प्रमाणात आर्थिक भूर्दंड पडतो.

३. वरील सर्व बाबी विचारात घेऊन शासन आता असे आदेश देत आहे की, विभागामार्फत निविदा काढून कंत्राटाद्वारे हाती घेण्यात येणा-या कामांच्या निविदा काढताना कोणत्याही ब-१ व ब-२ निविदेतील परिशिष्ट-अ निरंक ठेवावे.

ROTMH 1965 (400-11-09)1

(पृ.मा.पा.

४. कंत्राटदाराने आणलेल्या सर्व साहित्याची चाचणी व परिक्षणानंतरच योग्य ते साहित्य कामावर प्रत्यक्ष उपयोगात आणण्यात येईल असे पहावे. तसेच उपरोक्तसाहित्य कामांवर आल्याचा पुरावा नोंदविणे तसेच जमेची तारीखवार नोंद घेणे व त्यानंतर वापराची तारीखवार नोंद घेणे इत्यादी बाबी क्षेत्रिय अधिका-यांनी पूर्वी प्रमाणेच काटेकोरपणे पाळाव्यात.

५. हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील. या पूर्वीच ज्या कामांची निविदाप्रक्रिया सुरू झाली आहे त्यात बदल करण्यात येऊ नये.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २००९१११८१६५९२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(ज्योत्स्ना उ. टेंबुलकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,
सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
सर्व अधिकारी व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-लेखापरिक्षा, मंत्रालय, मुंबई (२ प्रती सारसंग्रहासाठी),
जलसंपदा विभाग- मोप्र-१,
वित्त विभाग- व्यय-११,
सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-यंत्रकक्ष-बांधकाम साहित्य,मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).

H 1996 -L35